www.maharashtra.gov.in
No. 201023119315900l

केंद्र पुरस्कृत योजनांचे निधीचे दुसऱ्या हप्त्याचा
निधी/पुर्णपणे व तातडीने प्राप्त करुन घेणेबाबत.

महाराष्ट्र शासन
परिपत्रक क्रमांक:स्वग्रायो-२०१०/प्र.क्र.३०९/योजना-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० डिसेंबर, २०१०

**परिपत्रक** :-

स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, या ७५% केंद्र पुरस्कृत योजनेचा पहिल्या हप्त्याचा निधी आर्थिक वर्षाच्या सुरुवातीस साधारणत: एप्रिल, मे मध्ये प्राप्त होतो व डिसेंबर मध्ये दुसऱ्या हप्त्याचा निधी प्राप्त होतो. दुसऱ्या हप्त्यासाठी आवश्यक तो प्रस्ताव संपूर्ण कागदपत्रांच्या व खर्चाच्या पूर्ततेसह केंद्र शासनास पाठविणे आवश्यक आहे. सदर प्रस्ताव प्राप्त होण्यास उशीर झाल्यास अगर पाठविलेल्या प्रस्तावातील त्रुटींची पूर्तता करण्यास उशीर झाल्यास निधीमध्ये एकूण नियतव्ययाच्या ५०% पासून ते २०% पर्यंत कपात करण्यात येते.

२. या दृष्टीने आढावा घेतला असता, सर्व जिल्ह्यांचे प्रस्ताव केंद्र शासनाकडे पाठविण्यात आले आहेत.

३. सदर प्रस्ताव केंद्र शासनाकडून छाननी करण्यात येतील. त्यावेळेस प्रस्तावात काही त्रुटी निघण्याची शक्यता आहे, अशा वेळेस सदर त्रुटींची पुर्तता त्वरीत होणे आवश्यक आहे.

४. त्याचप्रमाणे खर्च कमी, राज्यहिस्सा कमी, इत्यादीमुळे दुसऱ्या हप्त्याच्या निधीत कपात लागण्याची शक्यता असते. त्याचेही निराकरण करुन निधी पूर्णपणे प्राप्त होईल, यासाठी उचित कार्यवाही करणे आवश्यक आहे.

५. त्यादृष्टीने पाठविलेल्या प्रस्तावात काही त्रुटी असल्यास त्याची पूर्तता/निराकरण तत्काळ केले जाईल याबाबत संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी सोपवून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी त्याचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

६. कोणत्याही कारणाने संबंधित जिल्ह्यांच्या निधीत कपात लागल्यास त्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची राहील. याबाबत नोंद घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)

२) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)

प्रत,

उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व).